**गाळप हंगाम २०१५-१६ मध्ये राज्यातील सहकारी साखर कारखान्यांच्या अल्प मुदत कर्ज व त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : ससाका-२०१५/प्र.क्र. ३६०/३-स**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ९ ऑक्टोबर, २०१५

**प्रस्तावना :-**

ऊस गाळप हंगाम २०१४-१५ मधील शेतकऱ्यांकडील गाळपासाठी उपलब्ध ऊस, राज्यातील शिल्लक साखर साठा, साखर कारखान्यांची स्थिती या सर्व बाबी विचारात घेता कारखान्यांनी गाळप क्षमतेचा पूर्ण वापर करण्याच्या दृष्टीने आर्थिक अडचण येवू नये म्हणून नक्त मुल्य उणे असलेल्या आणि थकहमीवरील पूर्व हंगामी तसेच अल्प मुदत कर्ज बाकी नसलेल्या व हंगाम २०१४-१५ च्या FRP प्रमाणे दि. ३०.९.२०१५ पर्यंत किमान ९०% ऊस देयके अदा केलेल्या फक्त सहकारी साखर कारखाने तसेच सहकारी साखर कारखान्यांनी चालविण्यास घेतलेल्या सहकारी कारखान्यांकरीता सन २०१५-१६ करीता अल्प मुदत कर्ज आणि त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मंत्रिमंडळाच्या दि.०६/१०/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार गाळप हंगाम २०१५-१६ साठी नक्त मुल्य उणे असलेल्या आणि थकहमीवरील पूर्व हंगामी तसेच अल्प मुदत कर्ज बाकी नसलेल्या व हंगाम २०१४-१५ च्या FRP प्रमाणे दि. ३०.९.२०१५ पर्यंत किमान ९० % ऊस देयके अदा केलेल्या फक्त सहकारी साखर कारखाने तसेच सहकारी साखर कारखान्यांनी चालविण्यास घेतलेल्या सहकारी कारखान्यांकरीता अल्प मुदत कर्ज मर्यादेपर्यंत आणि त्यावरील व्याजास शासन थकहमी देण्यास मान्यता देण्यात येत आहे. नक्त मुल्य अधिक असलेले आणि भाडेतत्वावर, भागिदारी तत्वावर चालविण्यास दिलेले, विक्री झालेले आणि अवसायानातील साखर कारखान्यांना सदर योजना लागू राहणार नाही.

२. साखर कारखान्याच्या गाळप क्षमतेनुसार अल्प मुदत कर्ज मर्यादा राहील. त्यानुसार १२५०(TCD) पर्यन्त रु.५.०० कोटी, १२५१ ते २५०० (TCD) पर्यन्त रु. ७.०० कोटी, २५०१ ते ३५००(TCD) पर्यन्त रु. ९.०० कोटी, ३५०१ ते ५००० (TCD) पर्यन्त रु. १२.०० कोटी, आणि ५००० (TCD ) पेक्षा जास्त रु. १५.०० कोटी पर्यंत अल्प मुदत कर्ज मर्यादा राहील.

३. सदर धोरणानुसार साखर कारखान्याकडून प्राप्त होणा-या शासन हमीच्या प्रस्तावास मा.मंत्री(सहकार) यांची मान्यता प्राप्त झाल्यानंतर वित्त विभागामार्फत शासन हमीचे शासन निर्णय निर्गमित करण्यात येतील.

४. सदर अल्प मुदत कर्ज मर्यादेपर्यंत आणि त्यावरील व्याजास खाली नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून शासन थकहमी देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(१) सदरची योजना ही फक्त नक्त मुल्य उणे असलेल्या आणि थकहमीवरील पूर्व हंगामी तसेच अल्प मुदत कर्ज बाकी नसलेल्या व हंगाम २०१४-१५ च्या FRP प्रमाणे दि. ३०.९.२०१५ पर्यंत किमान ९० % ऊस देयके अदा केलेल्या फक्त सहकारी साखर कारखाने तसेच सहकारी साखर कारखान्यांनी चालविण्यास घेतलेल्या सहकारी कारखान्यांकरीता लागू राहील.

(२) नक्त मुल्य अधिक असलेले आणि भाडेतत्वावर, भागिदारी तत्वावर चालविण्यास दिलेले, विक्री झालेले आणि अवसायानातील साखर कारखान्यांना सदर योजना लागू राहणार नाही.

(३) शासनाने हमी दिलेल्या साखर कारखान्यांना आपले कार्यक्षेत्रातील संपूर्ण ऊस गाळप होईपर्यन्त कारखाना सुरु ठेवणे बंधनकारक राहील. तसेच थकहमीवरील सदर अल्पमुदत कर्जाचा वापर, कर्ज ज्या प्रयोजनासाठी घेतले आहे, त्यासाठीच करणे तसेच कारखाना सुरु करून गाळप करणे बंधनकारक राहील.

(४) संबंधित साखर कारखाने प्रमुख ऋणको (Principal Debtor) राहतील.

(५) संबंधित कारखान्यांना शासनाचे पुर्व परवानगीशिवाय कोणतेही कर्ज उभारता येणार नाही.

(६) सदर थकहमीची मुदत हमी दिल्यापासून हंगाम अखेरपर्यंत वैध राहिल. ही हमी कारखान्यास मंजूर करण्यात येणा-या हमी रकमेच्या कर्जाच्या रकमेपुरती व त्यावरील व्याजाच्या रकमेपुरती सिमीत राहिल.

(७) सहकारी साखर कारखान्यांनी घेतलेल्या कर्जाची परतफेडीस विलंब अथवा कसूर होणार नाही व त्याचे दायित्व शासनावर येणार नाही याची दक्षता साखर आयुक्त, पुणे यांनी घ्यावी.

(८) सदर शासन हमीवरील कर्ज वसुलीकरीता साखरेचा पुरेसा साठा व इतर माल तारण/मत्ता प्रतिभूती म्हणून घेतल्यानंतर कर्ज मंजूर करण्यात यावे. साखर साठ्याचे कोणत्याही प्रकारे नुकसान होणार नाही व त्याची सुरक्षिततेची जबाबदारी बँक घेईल व साखर साठ्याचे संरक्षण होईल याची व्यवस्था करील. तसेच थकहमीच्या पोटी साखर कारखान्यांच्या मत्तेवर भार निर्माण करण्यात यावा.

(९) कारखान्याने उत्पादित केलेल्या सर्व साखरेची विक्री शासन हमीवर कर्ज देणा-या धनको बँकांमार्फत त्यांचे बँकेत एक स्वतंत्र Escrow Account व्दारे करण्यात यावी व या विक्रीपैकी प्रति क्विंटल रु.२५०/- टॅगिंग करुन प्राप्त होणारी रक्कम कर्ज खाती जमा करावी. या कर्ज

खात्यामधील जमा निधीचा उपयोग फक्त शासन हमीवरील दिलेले अल्प मुदत कर्ज, त्यावरील व्याज व शासन हमी शुल्क या देय रकमा देण्यासाठी करता येईल.

(१०) कर्जाच्या परतफेडीबाबत होणा-या कसूरीची सूचना शासनास ९० दिवसांच्या आत देणे संबंधित बँकेला बंधनकारक राहील.

(११) संबंधित बँकानी संबंधित कारखान्याकडून कर्ज वसुलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय बँकेला हमी पुर्ततेकरिता शासन हमीचा प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. कर्जाची परतफेड करण्याची वैयक्तिक व सामुहिक जबाबदारी संबंधित कारखान्यांच्या संचालक मंडळाची राहील. हमी अवहानीत होऊन राज्य शासनास कर्जाची परतफेड करावी लागल्यास संबंधित कारखान्याच्या चल/अचल मालमत्तेची विक्री करुन वसुली करण्याचा हक्क शासनास राहील.

(१२) सदर हमी शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ५.११.१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहिल.

**५.** सदर शासन निर्णय राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक ०६.१०.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९९/१५/व्यय-२, दि.०३.१०.२०१५ तसेच अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७८/अर्थबळ, दिनांक ०३.१०.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५१००९१५२८१९६१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr Sudin Popat Gaikwad

Digitally signed by Dr Sudin Popat Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8ff188a569f4a95d2f0ce8ca61e60d8aa5f51a1bf65b42dd49bb26d165941d9e, cn=Dr Sudin Popat Gaikwad
Date: 2015.10.09 15:33:00 +05'30'

**( डॉ. सुदिन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) मा. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान महालेखाकार (लेखापरिक्षा -१ )/ (लेखा व अनुज्ञेयता -१ ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) प्रधान महालेखाकार (लेखापरिक्षा -२ )/ (लेखा व अनुज्ञेयता -२ ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
८) सहकार आयुक्त, व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१२) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांनी वरील आदेश त्यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व साखर कारखान्यांच्या निदर्शनास आणावेत.
१३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१४) वित्त विभाग व्यय-२ /अर्थसंकल्प -३/ अर्थसंकल्प -१३/ अर्थबळ , मंत्रालय, मुंबई.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) वरिष्ठ कोषागार अधिकारी , पुणे
१७) अध्यक्ष / कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी बँक मर्या. मुंबई
१८) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ म., नरीमन पॉईंट, मुंबई.
१९) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील सर्व अधिकारी/ कार्यासने.
२०) ३ स- संग्रहार्थ.